**राज्यामध्ये १४ एप्रिल या दिवशी “भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर ज्ञान दिन” दरवर्षी साजरा करण्याबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण -२०१७/ प्र.क्र. ७५/ का.२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १३ एप्रिल, २०१७

**<u>प्रस्तावना</u> :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचा जन्म मध्य प्रदेशातील महू येथे झाला होता. त्यांचे मूळ गांव महाराष्ट्रातील रत्नागिरी जिल्हयातील मंडणगड तालुक्यातील अंबडवे येथे आहे.त्यांच्या शिक्षणाची सुरुवात सन १९०२ मध्ये सातारा येथे झाली. त्यांनी मॅट्रिकची परिक्षा एलफिन्स्टन हायस्कूल, मुंबई येथून १९०७ मध्ये उत्तीर्ण केली. एलफिन्स्टन कॉलेज मधून मुंबई विद्यापीठाची अर्थशास्त्र व राज्यशास्त्र विषयाची पदवी (बी.ए.) त्यांनी प्राप्त केली होती. सन १९१५ मध्ये त्यांनी अर्थशास्त्र, समाजशास्त्र, इतिहास, मानववंशशास्त्र, राज्यशास्त्र इत्यादी विषयांचा सखोल अभ्यास परदेशात जावून केलेला होता. सन १९१७ मध्ये कोलंबिया विद्यापीठातून पी.एच.डी.ची पदवी,सन १९२१ मध्ये लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समधून एम.एस्सी.ची पदवी,सन १९२० च्या कालावधीत त्यांनी ग्रेज इन, लंडन या संस्थेतून बॅरिस्टर- ॲट- लॉ ची पदवी, लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमीक्स, लंडन येथून डी.एस्सी.(इकॉनॉमिक्स) ची पदवी त्यांनी संपादन केली.

२. न्यूयॉर्क येथील कोलंबिया विद्यापीठाने त्यांना एल.एल.डी. तर, हैद्राबाद येथील उस्मानिया विद्यापीठाने सन १९५३ मध्ये डी.लीट् ही पदवी प्रदान केली.अशाप्रकारे भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर हे अत्युच्च पदवीधारक होते.त्यांनी प्राप्त केलेल्या या असंख्य पदव्या पाहता त्यांची असलेली ज्ञान लालसा दिसून येते. त्यांनी त्यांच्या अखंड आयुष्यात विविध विषयांचा अभ्यास केलेला होता. अशा या ज्ञान महर्षिचा जन्म दिवस, दिनांक “१४ एप्रिल” हा “ज्ञान दिवस” म्हणून राज्यात दरवर्षी साजरा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. राज्यामध्ये “भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचा जन्मदिवस दि.१४ एप्रिल हा “ज्ञान दिवस” म्हणून दरवर्षी साजरा करण्याचे निर्देश या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत. यासाठी राज्यभरात खालीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित करण्यात यावा:-

| दिनांक | कार्यक्रम |
| --- | --- |
| १४ एप्रिल, २०१७ | • सकाळी १०.०० वाजता भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रतिमेस पुष्पहार अर्पण करुन ज्ञान दिवसाच्या आयोजनाचा उद्देश विशद करावा.<br>• भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी, अभ्यासलेले अर्थशास्त्र, समाजशास्त्र, इतिहास, मानववंशशास्त्र, राज्यशास्त्र इत्यादी विषयांतील त्यांची ग्रंथसंपदा याबाबतची माहिती देण्यासाठी राज्यातील शाळा/महाविद्यालये/इतर शैक्षणिक संस्थांमध्ये संबंधित क्षेत्रातील तज्ञ वक्त्यांची व्याख्याने आयोजित करण्यात यावीत.<br>• हा कार्यक्रम संबंधित जिल्हाधिकारी यांनी आपआपल्या जिल्ह्यातील सहायक आयुक्त, समाज कल्याण यांच्यामार्फत राबविण्यात यावा. |

२. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१७०४१३१७२१०५९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Muralidhar Sahai

Digitally signed by Bhagwan Muralidhar Sahai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=57dd6ec1681532b63c78bdc2d0f79ab4b9efccc6814de3df1f59d557777b3c45, cn=Bhagwan Muralidhar Sahai
Date: 2017.04.13 17:23:13 +05'30'

**( डॉ. भगवान सहाय )**
अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सर्व विभागीय आयुक्त, महसूली विभाग
७. आयुक्त, समाजकल्याण, पुणे
८. महासंचालक,डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी),पुणे
९. सर्व जिल्हाधिकारी,महाराष्ट्र राज्य
१०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
११.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,महाराष्ट्र राज्य

१२.सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग,महाराष्ट्र राज्य
१३.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी , जिल्हा परिषद
१४.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर
१५.निवासी लेखा परिक्षक, मुंबई/अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७.निवडनस्ती.